**श्री. क्षेत्र पंढरपूर येथील आषाढी वारी २०२५ करीता औषध, साहित्य सामुग्री खरेदीसाठी रु. ५३५.०० लक्ष एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२५/प्र.क्र.१०९/खरेदी कक्ष

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २९ मे, २०२५.

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये-राज्यस्तर, मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/नस्ती क्र.१७/आषाढी वारी २०२५/प्र.मा./७०७५-७९/२०२५, दि. २७ मे,२०२५

**प्रस्तावना:-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये प्रतिवर्षी प्रमाणे श्री. क्षेत्र पंढरपूर येथे आषाढी वारी निमित्त देहु-आळंदी ते पंढरपूर या पालखी सोहळ्यात सहभागी होणाऱ्या वारकऱ्यांकरीता प्रतिबंधात्मक व उपचारात्मक आपत कालीन सुविधा पुरविण्याची शासनाकडे मागणी प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने सदर वारकऱ्यांना आरोग्य सुविधा पुरविण्यासाठी खास बाब म्हणून अंदाजीत खर्चास प्रशासकिय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. क्षेत्र पंढरपूर येथे आषाढी वारी निमित्त देहु-आळंदी ते पंढरपूर येथे पालखी सोहळ्यात सहभागी होणाऱ्या वारकऱ्यांकरीता प्रतिबंधात्मक व उपचारात्मक आपत्कालीन आरोग्य सुविधा,औषधी, साहित्यसामुग्री व इतर खालील बाबींकरीता सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये-राज्यस्तर, मुंबई यांच्या वाचा क्र.१ येथील रु. ५३५.०० लक्ष एवढ्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | अंदाजित खर्च | लेखाशिर्ष व उद्दीष्ट |
|---|---|---|---|
| १. | पंढरपुर याठिकाणी येणा-या प्रतिनियुक्ती केलेले अधिकारी व कर्मचारी (डॉक्टर्स, नर्सेस व इतर कर्मचा-यांकरिता) जेवण, नाष्टा व पाणी इत्यादी | रू. ५०.०० लक्ष | **२२१० ०१४६ (१३-कार्यालयीन खर्च )** |
| २. | पंढरपुर याठिकाणी येणा-या प्रतिनियुक्ती केलेले अधिकारी व कर्मचारी (डॉक्टर्स, नर्सेस व इतर कर्मचा-यांकरिता) राहण्याची व्यवस्था इत्यादी | रू. ६०.०० लक्ष | |
| ३. | २० ठिकाणी उपचार केंद्राकरीता भौतिक साहित्य व सुविधा निर्माण करणे इत्यादी | रू. ४०.०० लक्ष | |
| ४. | वाहतुक व्यवस्था व इंधन खर्च इत्यादी | रू. १५.०० लक्ष | |
| ५. | आरोग्यदुत यांच्याकरीता इंधन खर्च इत्यादी | रू. १५.०० लक्ष | |
| ६. | आकस्मिक खर्च (केसपेपर, कार्डस, इंटरनेट, वॉकीटॉकी, वीजबिल, सीसीटीव्ही इत्यादी) | रू. १५.०० लक्ष | |

| अ.क्र. | बाब | अंदाजित खर्च | लेखाशिर्ष व उद्दीष्ट |
|---|---|---|---|
| ७. | आरोग्यविषयक कार्यक्रमांची व उपलब्ध सुविधांची माहिती व प्रसिध्दी | रू. १००.०० लक्ष | |
| ८. | औषधे व साहित्य सामुग्री खरेदी | रू. २४०.०० लक्ष | **२२१० ०१४६ (२१-पुरवठा व सामग्री )** |
| | **एकूण अंदाजित खर्च** | **रू. ५३५.०० लक्ष** | |

**२.** उपरोक्त तक्त्यामध्ये नमुद अ.क्र.१ ते ८ सेवा इव्हेंटबेस नुसार बाहयस्त्रोत एजन्सी ई-निविदा प्रक्रिया अंती पुरवठादार निश्चित करुन उपलब्ध करुन घेणेस व सदर बाब तातडीची व अत्यावश्यक असल्याने अल्प मुदतीची निविदा करणेस मान्यता देण्यात येत आहे.

**३. अटी व शर्ती :-**

१. मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा, कार्यालय पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व उपसंचालक, आरोग्य सेवा, कार्यालय पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर बाबींवरील खर्चाची निविदा प्रक्रिया उपसंचालक स्तरावर नियुक्त खरेदी समितीचे मान्यतेने पूर्ण करुन पुरवठा आदेश उपसंचालक स्तरावर खरेदी समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात यावेत.

२. खरेदी करावयाची औषधे व साहित्य सामुग्री तसेच इतर बाबी करीता सक्षम प्राधिकरणाने तांत्रिक मान्यता दिल्यानंतरच खरेदीची प्रक्रीया राबविण्यात यावी.

३. सदर सेवेसाठी शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामागार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग III/उद्याग-४, दि. ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

४. निविदा प्रक्रिया राबवितांना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. प्रशासकीय मान्यता देताना प्रक्रियेअंतीम निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठीकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

**४.** उपरोक्त बाबींकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर-१
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
११०- रुग्णालये व दवाखाने
(०१) मुफसल रुग्णालये व दवाखाने, (०१)(०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (अनिवार्य) संकेतांक क्रमांक (२२१० ०१४६)
बाब:- १३- कार्यालयीन खर्च व २१-पुरवठा व सामग्री

**५.** हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम

क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२९१७१८५४१६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Ashok Saundaji Kayande
Date: 29-05-2025 17:46:12

**( अशोक कायंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई/पुणे.
३) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्य-स्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१०) उपसंचालक,आरोग्य सेवा,पुणे मंडळ,पुणे.
११) जिल्हा आरोग्य अधिकारी,सोलापूर/पुणे.
१२) जिल्हा शल्य चिकित्सक,पुणे/सोलापूर.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे/सोलापूर.
१४) निवडनस्ती (खरेदी कक्ष)